**नांदेड वाघाळा महानगरपालिका हद्दीतील नांदेड-हिंगोली रस्त्याचा भाग (१) रेल्वे भुयारी पुल ते महाराणा प्रताप चौक रा.मा.४४ चा भाग कि.मी.०/०० ते १/४५० भुयारी पुलासह व (२) महाराणा प्रताप चौक ते एम.जी.एम.कॉलेज विमानतळाच्या भिंतीपर्यंत प्र.रा.मा.२, कि.मी.५३९/३७० ते ५४०/३२०, अवर्गीकृत (डी क्लासीफाय) करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक:रविया-२०११/प्र.क्र.६७/नियो-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-५/८/२०११.

संदर्भ :- १) शासन निर्णय क्रमांक-टीआरएस-२०१०/प्र.क्र.४२/रस्ते-१, दिनांक-७.३.२०११

**<u>प्रास्ताविक :-</u>**

रस्ते विकास योजना १९८१-२००१ मध्ये नांदेड-वाघाळा महानगरपालिका हद्दीमधील (१) रेल्वे भुयारी पुल ते महाराणा प्रताप चौक रा.मा.४४ चा भाग कि.मी.०/०० ते १/४५० भुयारी पुलासह व (२) महाराणा प्रताप चौक ते एम.जी.एम.कॉलेज विमानतळाच्या भिंतीपर्यंत प्र.रा.मा.२, कि.मी.५३९/३७० ते ५४०/३२०, या रस्त्यांचा समावेश आहे. सद्यःस्थितीत एम.जी.एम.कॉलेजपासून पुढील रस्ता नांदेड विमानतळाच्या विस्तारीकरणामुळे कायमस्वरुपी बंद झाला आहे. त्यामुळे प्र.रा.मा.-२ ची खंडीत झालेली लांबी पूर्व वळणरस्ता (Eastern Major Bypass) व लघु वळणरस्ता (Mini Bypass) याद्वारे जोडण्यात आली आहे. नांदेड शहरात येणारी अवजड वाहनांची वाहतुक ही या वळणरस्त्यांवरुन शहराबाहेरुन सुरळीत सुरु आहे.

२. वळणरस्ते पूर्ण झाल्यानंतर महानगरपालिका/नगरपालिका क्षेत्रातील सार्वजनिक बांधकाम विभागाचे रस्ते त्यांना हस्तांतरीत करण्याच्या शासनाच्या मार्गदर्शक सूचना आहेत. त्यानुसार नांदेड शहरातील उपरोक्त रस्त्याचा भाग नांदेड-वाघाळा महानगरपालिकेकडे संदर्भाधीन शासन निर्णयानुसार हस्तांतरीत करण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

नांदेड-वाघाळा महानगरपालिका हद्दीमधील (१) रेल्वे भुयारी पुल ते महाराणा प्रताप चौक रा.मा.४४ चा भाग कि.मी.०/०० ते १/४५० भुयारी पुलासह व (२) महाराणा प्रताप चौक ते

एम.जी.एम.कॉलेज विमानतळाच्या भिंतीपर्यंत प्र.रा.मा.२, कि.मी.५३९/३७० ते ५४०/३२० हे रस्त्याचे भाग रस्ते विकास योजना १९८१-२००१ (सुधारित) मधून अवर्गीकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahapwd.com या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११०८०५१११६४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे नावाने व आदेशानुसार.

( हिमांशु श्रीमाळ )
उप सचिव

प्रत

मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव,
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, सा.बां.विभाग, औरंगाबाद,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
विभागीय आयुक्त, नांदेड.
जिल्हाधिकारी, नांदेड.
महापालिका आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,
सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्ते व इमारती कार्यासनातील सर्व कक्ष अधिकारी व कार्यासने.
निवडनस्ती नियोजन-२ (सांख्यिकी )

D:\common\sak\kulkarni\plan-2\c.r.67.2011.doc